**महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या आस्थापनेवरील "कार्यासन अधिकारी / अधिक्षक" या पदावरुन सेवा प्रत्यावर्तीत करण्याबाबत.**

**श्रीमती र.अ.उपानेकर, सहायक कक्ष अधिकारी.**

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन आदेश क्रमांकः प्रतिनि २५१९/प्र.क्र.१२२/१४-अ**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

तारीख: १५ डिसेंबर, २०२१

**वाचा** :- १) सा.प्र.वि. पत्र क्र. प्रतिनि २५१९/प्र.क्र.१२२/१४-अ, दिनांक १०-०१-२०२० चे शासन आदेश.

२) महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नवी मुंबई यांचे क्र.मजीप्रा-२०१९/का.अ.-प्रतिनि/८४/आ-३/२२, दिनांक २६-०२-२०२० चे कार्यालयीन आदेश

३) कृ व पदुम विभाग नस्ती क्र.कृपवि-३२१९/प्र.क्र.४६९/प्रशा-१

**शासन आदेश**

संदर्भाधिन क्र.१ येथील दिनांक १०-०१-२०२० च्या आदेशान्वये श्रीमती र.अ.उपानेकर, सहायक कक्ष अधिकारी कृषि व पदुम विभाग यांच्या सेवा महाराष्ट्र जीवन प्राधिकरण बेलापूर, नवी मुंबई यांच्या आस्थापनेवरील "कार्यासन अधिकारी / अधिक्षक" या पदावर **प्रथमत: २ वर्षाच्या** कालावधीसाठी आदेशात नमूद अटीं व शर्तीसह प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात आली होती. सदर अटीमध्ये खालीलप्रमाणे एक अट नमूद करण्यात आली आहे.

" (ब) जर त्यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने शासनाला आवश्यक वाटली तर प्रतिनियुक्तीचा कालावधी संपण्यापूर्वी कोणत्याही वेळी त्याला परत बोलावून घेण्याचा अधिकार शासन/संवर्ग नियंत्रण अधिकारी/सक्षम प्राधिकारी राखून ठेवील "

२. महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, बेलापूर, नवी मुंबई यांनी श्रीमती उपानेकर, यांना संदर्भाधिन क्र. २ येथील दिनांक २६-०२-२०२० च्या कार्यालयीन आदेशान्वये दिनांक ०१-०२-२०२० रोजी कार्यासन अधिकारी या पदावर रुजू करुन घेतले.

३. मंत्रालयीन विभाग व कृषि व पदुम विभागातील सहायक कक्ष अधिकारी संवर्गाची रिक्त पदे विचारात घेता या विभागाच्या दिनांक १०-०१-२०२० च्या आदेशातील परिच्छेद २ (ब) मध्ये नमुद तरतूदीनुसार श्रीमती र.अ.उपानेकर, सहायक कक्ष अधिकारी यांची महाराष्ट्र जीवन प्राधिकरण या कार्यालयातील प्रतिनियुक्ती दिनांक २०-१२-२०२१ (म.नं) पासुन संपुष्टात आणण्यात येत आहे. महाराष्ट्र जीवन प्राधिकरण बेलापूर, नवी मुंबई यांनी श्रीमती उपानेकर यांच्या सेवा त्यांचा मूळ विभाग (कृषि व पदुम विभागास) प्रत्यावर्तीत कराव्यात. तसेच दिनांक २१-१२-२०२१ पासून त्यांना वेतन व भत्ते महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांनी अदा करु नये.

४. प्रतिनियुक्ती ही संबंधित कार्यालयाची तात्पुरती व्यवस्था असून प्रतिनियुक्ती कालावघी समाप्त होण्यापूर्वी/समाप्त झाल्यानंतर संबंधित कर्मचाऱ्याच्या सेवा त्याच्या मूळ विभागास परत करणे आवश्यक/बंधनकारक आहे.

५. महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, बेलापूर, नवी मुंबई यांनी श्रीमती उपानेकर, यांच्या सेवा वर नमुद दिनांकास प्रत्यावर्तीत करुन त्यांना त्यांच्या मूळ विभागात रुजू होण्यासाठी तत्काळ कार्यमुक्त करावे.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११२१५१६५६००१३०७ असा आहे. हे शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, serialNumber=54b11b1ccbdc577d71dce3b313c3fef5dc2ad659e360f73b682d6b6fccb8aecf, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2021.12.15 16:56:55 +05'30'

( ग.भि.गुरव )
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

श्रीमती र.अ.उपानेकर, सहायक कक्ष अधिकारी, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, बेलापूर, नवी मुंबई
(संबंधित कार्यालयामार्फत)

**प्रत :-**

१) मुख्य प्रशासकीय अधिकारी (प्र), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मध्यवर्ती कार्यालय, सिडको भवन, दक्षिण कक्ष, २रा मजला, बेलापूर, नवी मुंबई. यांना माहितीस्तव सादर.
२) उप सचिव (पा.पु.-२३), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, गो.ते. रुग्णालय इमारत आवार, ७ वा मजला, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई-४००००१
३) उप सचिव (आस्थापना/प्रशा-१) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
४) सा.प्र.वि./१४-अ (संग्रहार्थ).